सन २०२३-२४

वितरण आदेश क्र.१

**माहितीचा अधिकार अधिनियमाखाली प्रशिक्षण देण्याकरिता यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे यांस सहाय्यक अनुदान २०२३-२४ (कार्यक्रम)**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- बीयुडी२०२२/प्र.क्र.१०१/सहा**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक- २४ जुलै, २०२३

**वाचा:** १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३

२) अतिरिक्त महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे यांचे पत्र क्र. सीआरटीआय-१५२३/XVII/मा. अ. प्रशि./२०२२-२३, दिनांक ०७.११.२०२२

**शासन निर्णय:**

यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेमार्फत राज्यातील जनमाहिती अधिकारी, अपीलीय प्राधिकारी यांना माहितीचा अधिकार अधिनियम, २००५ बाबत प्रशिक्षण देण्यात येते. सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये राज्यातील एकूण १७,५६० अधिका-यांना प्रशिक्षण देण्यासाठी ३८० प्रशिक्षण कार्यक्रम व अनुषंगिक खर्च भागविण्यासाठी एकूण रुपये रु. १,६२,६८,०००/- (रुपये एक कोटी बासष्ठ लाख अड्डुसष्ठ हजार फ़क्त) इतक्या निधीची तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतुदीपैकी १० % रक्कम रु.१६,२६,८००/- एवढे अनुदान वित्त विभागाने बीम्स प्रणालीवर उपलब्ध करुन दिले आहे.

२. संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये केलेल्या मागणीनुसार, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेला रु. १६,२६,८००/- (रुपये सोळा लाख सव्वीस हजार आठशे फक्त) इतके सहायक अनुदान(पहिला हप्ता) "मागणी क्र.ए-४, मुख्य लेखाशिर्ष "२०७० - इतर प्रशासनिक सेवा, ००३ प्रशिक्षण राज्य योजनांतर्गत योजना, (००) (०९) माहितीचा अधिकार अधिनियमाखाली प्रशिक्षण देण्याकरिता यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे यांस सहाय्यक अनुदान (कार्यक्रम) (२०७० ०८२६), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली वितरीत करण्यास पुढील अटी व शर्तींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे:-

अ) यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे (यशदा) या संस्थेने प्रत्यक्ष झालेल्या खर्चाइतकीच रक्कम कोषागारातून आहरित करण्याची दक्षता घ्यावी.

आ) सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर ती काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे.

इ) सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात केलेल्या खर्चाचा ताळमेळ करण्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित नियंत्रक अधिकारी तसेच आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील.

ई) यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेने उपरोक्त अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

उ) वितरित केलेल्या अनुदानाचे तपशीलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र (Utilization Certificate) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई व शासनाला तातडीने सादर करावे.

३. यशदा, पुणे या संस्थेस वितरीत केलेल्या सहायक अनुदानाची रक्कम रु. १६,२६,८००/- (रुपये सोळा लाख सव्वीस हजार आठशे फक्त) आहरण व संवितरण अधिकारी, यशदा, पुणे (कोड क्र.२२०१०००१२१) यांनी आहरीत करावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग एक, अनु क्र.२७, परिच्छेद क्र.१४९ नुसार व सदर अधिकारातील रकाना क्र.६ खालील अटींच्या अधीन राहून प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतां २०२३०७२४१७१३३७५६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANANT RAMCHANDRA VATSARAJ

Digitally signed by ANANT RAMCHANDRA VATSARAJ
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=1fc93ca8c9edf0c665939e013d400707469c917233256d64e102b6dfa410ae1f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8395A1E2B3F7E60F4426B32617F487E22423B26957BC4AA0F00C8A7DB8C39D24, cn=ANANT RAMCHANDRA VATSARAJ
Date: 2023.07.24 17:14:55 +05'30'

**(अ. रा. वत्सराज)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
३. महासंचालक, यशदा, पुणे
४. संचालक, माहिती अधिकार केंद्र, यशदा, पुणे
५. लेखाधिकारी, यशदा, पुणे (२ प्रती)
६. जिल्हा कोषागारअधिकारी, पुणे.
७. उप कोषागार कार्यालय, पुणे
८. वित्त विभाग(व्यय-४/अर्थसंकल्प १४), मंत्रालय, मुंबई
९. अवर सचिव, कार्यासन-२५, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.निवडनस्ती/ कार्यासन ६ सहा.